**मुंबई नागरी परिवहन प्रकल्पांतर्गत प्रस्तावित टप्पा-३ प्रकल्पासाठी निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१३/प्र.क्र.१३०/नवि-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ७ जानेवारी , २०१७.

**प्रस्तावना :**

मुंबई महानगर प्रदेशातील सार्वजनिक परिवहन व्यवस्थेत सुधारणा करण्याच्या उद्देशाने रेल्वे मंत्रालय व महाराष्ट्र शासन यांच्या संयुक्त विद्यमाने जागतिक बँकेच्या सहाय्याने मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-१ व मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-२ हाती घेण्यात आला आहे. सदर दोन्ही प्रकल्पांमध्ये रेल्वे घटकावर विशेष भर देण्यात आला असून रेल्वे घटकावरील खर्च केंद्र शासनाचे रेल्वे मंत्रालय व महाराष्ट्र शासन ५०:५० टक्के या प्रमाणात करीत आहेत. मुंबई नागरी परिवहन प्रकल्पामधील रेल्वे घटकाची अंमलबजावणी करण्याकरिता रेल्वे मंत्रालय व महाराष्ट्र शासन यांच्या संयुक्त विद्यमाने कंपनी अधिनियमाखाली "मुंबई रेल्वे विकास महामंडळ" या कंपनीची स्थापना करण्यात आली असून या महामंडळामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-१ व टप्पा- २ मधील रेल्वे घटकांतर्गत कामाची अंमलबजावणी करण्यात आली आहे.

मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत प्रस्तावित मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ (एमयुटीपी-३) अंतर्गत रु.१०९४७ कोटी अंदाजित खर्चाच्या कामांना केंद्र शासनाच्या मंत्रीमंडळाने मान्यता दिली असून सदर प्रकल्पासाठी बहुपक्षीय कर्ज घेण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे. सदर प्रकल्पात विरार-डहाणू दरम्यान रेल्वे मार्गाचे चौपदरीकरण करणे (तिसरी-चौथी रेल्वे मार्गिका टाकणे), कर्जत-पनवेल दरम्यान नवीन उपनगरीय रेल्वे सेवेकरिता मार्गिका टाकणे ( रेल्वे मार्गाचे दुपदरीकरण करणे), ऐरोली-कळवा दरम्यान उन्नत रेल्वे मार्ग बांधणे, नवीन रेल्वे गाड्या खरेदी करणे, मध्य व पश्चिम रेल्वे मार्गाच्या मध्य विभागात ट्रेस पास कंट्रोल( रुळ पार करता येऊ नयेत म्हणून संरक्षक भिंत बांधणे) तसेच तांत्रिक सहाय्य अशा कामांचा समावेश आहे.

उपरोक्त प्रकल्प भारतीय रेल्वेच्या सहभागाने मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-१ व टप्पा- २ च्या धर्तीवर रेल्वे मंत्रालय व महाराष्ट्र शासन यांचा ५०:५० टक्के आर्थिक सहभाग तत्त्वावर राबविण्यास मान्यतादेणे, प्रकल्प खर्चामध्ये राज्यशासनाकडून ५०% आर्थिक सहभाग उचलण्यासाठी मान्यता देणे तसेच राज्य शासनाच्यावतीने सदर प्रकल्पामध्ये ५०% सहभागाची रक्कम ही एमएमआरडीए व सिडको यांनी सोसण्याबाबत त्यांना निदेश देणे यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात सवर्कष विचारांती शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत राबविण्याचे प्रस्तावित असलेल्या मुंबई मागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ (एमयुटीपी-३) अंतर्गत प्रस्तावित रेल्वे प्रकल्पास व या प्रकल्पातील राज्य शासनाच्या आर्थिक सहभागास पुढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

१. मुंबई रेल्वे विकास महामंडळाने प्रस्तावित केलेले मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ अंतर्गत रु.१०९४८ कोटी प्रकल्प पूर्णत्वाच्या अंदाजित खर्चाचे खालील प्रकल्प :-

i. पनवेल-कर्जत रेल्वे मार्गाचे दुपदरीकरण करणे ( प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.२७८३ कोटी)

ii. ऐरोली -कळवा दरम्यान मुख्य रेल्वे मार्ग व ट्रान्स हार्बर रेल्वे मार्ग जोडणारा उन्नत मार्ग बांधणे ( प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.४७६ कोटी).

iii. पश्चिम रेल्वेच्या विरार-डहाणू रेल्वे मार्गाचे चौपदरीकरण करणे ( प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.३५७८ कोटी)

iv. नवीन रेल्वे गाड्या खरेदी करणे (५६५ कोचेस) (प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.३४९१ कोटी)

v. मध्य व पश्चिम रेल्वे मार्गाच्या मध्य विभागात ट्रेस पास कंट्रोल ( रुळ पार करता येऊ नयेत म्हणून संरक्षक भिंत बांधणे) (प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.५५१ कोटी)

vi. तांत्रिक सहाय्य (प्रकल्प पूर्णत्वाचा अंदाजित खर्च रु.६९ कोटी)

भारतीय रेल्वेच्या सहभागाने मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत ५०:५० आर्थिक सहभागातून राबविण्यास राज्य शासनाची तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. "ऐरोली - कळवा दरम्यान मुख्य रेल्वे मार्ग व ट्रान्स हार्बर रेल्वे मार्ग जोडणारा उन्नत रेल्वे मार्ग बांधणे, पश्चिम रेल्वेच्या विरार-डहाणू रेल्वे मार्गाचे चौपदरीकरण करणे, नवीन रेल्वे गाड्या खरेदी करणे , मध्य व पश्चिम रेल्वे मार्गाच्या मध्य विभागात ट्रेस पास कंट्रोल तसेच तांत्रिक सहाय्य हे उपनगरीय रेल्वे प्रकल्प मुंबई महानगर प्रदेशातील जनतेस फायदेशिर असल्याने याप्रकल्पातील राज्यशासनाचा ५० टक्के हिस्सा रु. ४०८२.५० कोटी चा आर्थिक सहभाग मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने सोसावा असे प्राधिकरणास निदेश देण्यात येत आहेत.

३. पनवेल ते कर्जत या रेल्वे मार्गाचे दुपदरीकरण याचा सिडको परिसरासही फायदा होणार असल्याने "पनवेल ते कर्जत या दरम्यान नवीन उपनगरीय रेल्वे सुरु करण्यासाठी रेल्वे मार्गाचे दुपदरीकरण करणे" या प्रकल्पात राज्यशासनाच्या ५०% हिश्श्याचा आर्थिक सहभाग मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण आणि सिडको यांनी रु ६९५.७५ कोटी प्रत्येकी असा समप्रमाणात सोसावा असे प्राधिकरणास व सिडकोस निदेश देण्यात येत आहेत.

४. एमएमआरडीए व सिडको यांनी सोसावयाच्या उपरोक्त आर्थिक सहभागांच्या रक्कमेमध्ये त्यांच्याशी विचारविनिमय करून आश्यकतेनुसार आपसात बदल करण्यास तसेच त्याप्रमाणे एमएमआरडीए व सिडको यांना निदेश देण्याचे अधिकार शासनास ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहेत.

सदरचा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. विवि/शिकाना/ २९६ , दिनांक १५.१२.२०१६ अन्वये प्राप्त अभिप्राय व त्यासंदर्भात मंत्रिमंडळाने दिनांक १५ डिसेंबर , २०१६ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१७१००५१५३४२६४५२५** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shriram
Dattatray Yadav

Digitally signed by Shriram Dattatray Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, cn=Shriram Dattatray Yadav
Date: 2017.10.04 17:17:47 +05'30'

**(श्रीराम यादव)**
उपसचिव, महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१. मा.चेअरमन, रेल्वे बोर्ड, रेल भवन, रेल्वे मंत्रालय नवी दिल्ली ,
२. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५. मा. वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६. महानगर आयुक्त,मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,वांद्रे कुर्ला संकुल,वांद्रे (पूर्व),मुंबई-५१
१७. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ, चर्चगेट रेल्वे स्टेशन इमारत, २ रा मजला मुंबई
१८. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१९. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्यगिक विकास महामंडळ महाराष्ट्र मर्या.( सिडको ) मुंबई
२०. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई

२१. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ, चर्चगेट रेल्वे स्टेशन , २ रा मजला मुंबई

२२. विभागीय आयुक्त कोकण भवन नवीमुंबई

२३. महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.

२४. महाव्यवस्थापक, पश्चिम रेल्वे, मुंबई.

२५. महाव्यवस्थापक, कोकण रेल्वे, कोकणभवन नवी मुंबई.

२६. जिल्हाधिकारी मुंबई शहर जिल्हा /मुंबई उपनगर जिल्हा/ठाणे जिल्हा/ पालघर जिल्हा

२७. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२८. कार्यासन अधिकरी (नवि-२१/२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**२९.** निवड नस्ती (नवि-७).**